राज्यातील अल्पसंख्याक बहुल भागातील
विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत दुसरी/
तिसरी पाळी सुरू करणे...
सन २०२४-२५ करिता निधी वाटप.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः औप्रशि-२०२४/प्र.क्र. १५ /का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २४ एप्रिल, २०२४

**वाचा:-**

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.: आयटीआय-००९/(११/०९)/व्यशि-३, दि. २९ ऑगस्ट, २००९ व दि.२१ ऑगस्ट, २०१०,
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.: अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४
३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.१२/नियोजन/२०२४/१०३, दि.१२/४/२०२४

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी ४२ अल्पसंख्याक बहुल भागातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये दुसऱ्या/तिसऱ्या पाळीत २४८ तुकडया त्याचप्रमाणे बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणाऱ्या २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये २८ तुकडया सुरू करण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००-इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (००) (१६) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४)" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ करिता रु.४८,५६,५६,०००/-इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने निधी वितरीत करण्याची विनंती केलेली आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकास अनुसरून निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या ४२ विद्यमान शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था तसेच बृहन्मुंबईतील मांडवी व चांदिवली (पवई) येथे नव्याने सुरू होणाऱ्या (सद्य:स्थितीत एल्फिस्टन महाविद्यालय व मुलुंड येथे वर्ग सुरू असलेल्या) २ नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थाकरिता वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकास अनुसरून सन २०२४-२५ या आर्थिक

वर्षाकरिता आवश्यक खर्च भागविण्यासाठी **रु. ५,०२,०३,००० (अक्षरी रुपये पाच कोटी दोन लाख तीन हजार फक्त)** इतका निधी पुढीलप्रमाणे वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी सहाय्यक अनुदान, (२२३५ ए ५३४) | सन २०२४-२५ साठी अर्थसंकल्पित करण्यात आलेले अनुदान | शासन परिपत्रक दि.१/०४/२०२४ नुसार सद्य:स्थितीत बीम्स प्रणालीवर उद्दीष्टांखाली उपलब्ध निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| ०१, वेतन | ४२,००,००,००० | ४,५०,००,००० | ४,५०,००,००० |
| ०६, दूरध्वनी, वीज, पाणी शुल्क | २५,५०,००० | २,५०,००० | २,५०,००० |
| १०, कंत्राटी सेवा | १,००,००,००० | १५,००,००० | १५,००,००० |
| ११, देशांतर्गत प्रवास खर्च | ६,००,००० | ४०,००० | ४०,००० |
| १३, कार्यालयीन खर्च | ४०,००,००० | २,५०,००० | २,५०,००० |
| १४, भाडे, पट्टी व कर | ६०,००,००० | ३,७५,००० | ३,७५,००० |
| २१, पुरवठा व सामुग्री | ३०,००,००० | २,००,००० | २,००,००० |
| २४, पेट्रोल, तेल व वंगण | ६,००,००० | ४०,००० | ४०,००० |
| २६, जाहिरात व प्रसिध्दी | १,५०,००० | १०,००० | १०,००० |
| २७, लहान बांधकामे | ६,५०,००० | ५०,००० | ५०,००० |
| २८, व्यावसायिक सेवा | १०,००,००० | ६३,००० | ६३,००० |
| ३४, शिष्यवृत्त्या/ विद्यावेतन | २,७१,५६,००० | १८,००,००० | १८,००,००० |
| ५२, यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | ९९,५०,००० | ६,२५,००० | ६,२५,००० |
| **एकूण** | **४८,५६,५६,०००** | **५,०२,०३,०००** | **५,०२,०३,०००** |

३. सदर तरतूद यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावयाच्या अटीच्या अधिन राहून संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून या करिता ते “नियंत्रक अधिकारी” आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून काम पाहतील.

४. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी निधी वितरीत करतांना तसेच वितरीत निधी खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, प्रशासकीय मान्यता आदेश व वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय इत्यादी मधील अटी व शर्तीची पूर्तता करावी.

५. या योजनेंतर्गत अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील.

६. लेखानुदानाद्वारे प्राप्त झालेल्या निधीचे वितरण करतांना लोकसभा निवडणुक - २०२४ च्या आदर्श आचारसंहितेचे पालन होत आहे, याबाबत खात्री करण्याची दक्षता घेण्यात यावी.

७. "सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.: अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. १ एप्रिल, २०२४ मधील अटींची पुर्तता होत असल्याने प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे."

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०४२४१३२२१४९६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARVEEN JAVED JUGARI

Digitally signed by PARVEEN JAVED JUGARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7756c9321eaddbc49e6838c15545ed29cc20adf253d62a3e9c3655f35e48b136, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=33DA49010D9298976BDFC5AFC6237D485983227E0643169266E6A377187E832D, cn=PARVEEN JAVED JUGARI
Date: 2024.04.24 13:35:14 +05'30'

**( परवीन जुगारी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, (लेखाव अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. संचालक (प्रशिक्षण),व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (सर्व), महाराष्ट्र राज्य, संचालक (प्रशिक्षण),व्यवसाय शिक्षणव प्रशिक्षण संचालनालय यांचे मार्फत अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी, संचालक (प्रशिक्षण),व्य.शि. व प्र. संचालनालय यांचे मार्फत
८. नियोजन विभाग का. १४७५,
९. वित्त विभाग, व्यय-१/ अर्थ-३ व १४,
१०. अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कम व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाच्या संचालक, (प्रशिक्षण)-(२२३०) झेडए-१, ०००४ वर बी.डी.एस. तात्काळ उपलब्ध करून देण्याची विनंती करण्यात येत आहे.
११. निवडनस्ती.